# ऑफीस

**-- चं.प्र.देशपांडे.**

( विलास, विजय आणि विनय हे तीन कारकून. तिघेही तीसच्या आसपास. विशाखा ही एक टायपिस्ट -- सुमारे पंचवीस. विजापुरेसाहेब सुमारे पंचेचाळीस. विठ्ठल नामक प्यून -- चाळीस. पडदा उघडतो तेव्हा रंगभूमीवर कुणी नाही. उजव्या हाताला तीन टेबल - खुर्च्या. टेबलांवर फाईली, कागदपत्रे वगैरे. डाव्या हाताला एक टेबलखुर्ची - त्या टेबलावर टाईपरायटर.

प्रथम विलास येतो. रूटीन सुरू करण्यापूर्वीचा संथपणा. मस्टर शोधून त्यावर सही करतो. नंतर इकडेतिकडे पाहतो.वर्तमानपत्र येऊन पडलेले असते ते घेतो. आपल्या खुर्चीवर बसून जरा वेळ चाळतो. मग बाजूच्या टेबलावर टाकून देतो. दरम्यान विजय येतो आणि मस्टरवर सही करतो. आपल्या खुर्चीवर बसून वर्तमानपत्र चाळतो. तोवर विलास डोक्यामागे हात अडकवून स्वस्थ बसून. विनय येतो. मस्टरवर सही करायला जातो.)

विजयः ( वर्तमानपत्र चाळून झाल्यावर बाजूला टाकत ) हं -- काय विलासराव !

विलासः बोला.

विजयः नुसतं ' बोला ' काय -- ' बोला विजयराव ' म्हणायचं । आम्ही कसं तुम्हाला विलासराव म्हटलं ! काय विनयपंत ! ( -- हे विनयला )

विनयः बरोबर विजयराव !

विजयः शिका, विलासराव, विनयपंतांकडून काही मॅनर्स वगैरे शिका.( विनय स्मित करतो. विलास अगदी किंचित स्मित करतो. समोरचे कागद चिवडतो आणि पुन्हा कागदांकडे बघत स्वस्थ बसतो.) हं काय मग विलासराव -- काय एकदम विचारात !

विलासः विज्या, मला कधी कधी अशी शंका येते की साले हे एवढे जे निरनिराळ्या नावांचे कागद आपल्याकडे येतात ती सगळी माणसं कुठंतरी असतील काय खरोखरची ?

विजयः आपली शंका फारच मोठी आहे, परंतु मी जरा लघुशंकेला जाऊन येतो.( जातो. )

विलासः नाही, विन्या, हसू नकोस पण खरंच बघ. मला असं वाटतं की ही माणसं बिणसं साली नसणारच कुठं, काय ! पण आपल्याला ऑफीसात काम पाहिजे म्हणून सालं कुणीतरी हे सगळे कागद रकानेच्या रकाने भरून पाठवत असणार आणि या कामासाठी दोन तीन माणसं कुठल्यातरी ऑफीसात बसलेली असणार.

विनयः ( हसून ) असेल बुवा ! पण काय आहे की समजा ही माणसं ( कागदांकडे बोट ) नसलीच खरी -- काय -- तरी आपल्याला महिना अखेरीस पगार हवा असल्यानं त्यांना खरी धरून चालणं हेच आपल्या हिताचं आहे ! तेव्हा कामाला लागा !

विलासः बरं, यातल्या प्रत्येक कागदाची नोंद असल्यानं हे नष्टही करून टाकता येत नाहीत !

विनयः ( आपले काम चालू करीत ) काम करत जाणे आणि थोडे थोडे संपवत राहणे हा एकच मार्ग -- दुसरे भुक्कड विचार काही कामाचे नाहीत.

विलासः असं म्हणतोस ! ( दोन क्षण वैचारीक पाहून ) ठीक आहे.( कामाला लागतो. )

विजयः ( प्रवेश करून आपल्या खुर्चीवर बसत ) कसल्या शंका बिंका काढता ! कामं करा कामं ! सीझन स्लॅक असला किंवा स्लॅक केला की हे असं होतं.( कामाला सुरुवात करतो.)

विलासः ( जरा वेळाने खालच्या आवाजात ) विज्या, काल वेलणकरसाहेब हेड ऑफीसमधून कशासाठी आले होते माहीत आहे ?

विजयः नाही बुवा. मी परवा सहज विजापुरे साहेबांना विचारलं की हेड ऑफीसमधून वेलणकरसाहेब कशासाठी येणार आहेत तर ते त्यांनाही माहीत नव्हतं. या भागात त्यांचा दौरा होता म्हणून सहज जाताजाता आपल्या आफीसला भेट आहे असं मला ते म्हणाले होते.

विलासः बरोबर आहे. त्यावेळी कुणालाच माहीत नव्हतं. ( त्यांचं खालच्या आवाजातलं बोलणं पाहून विनय जागचा उठून येऊन जवळ उभा राहतो.) काल काम संपवून तुम्ही गेलात -- त्यानंतर मी जरा वेळ काम करत

बसलो होतो. वेलणकरसाहेबांनी काही ठराविक कागदपत्रं, पुस्तकं वगैरे भराभर पाहून घेतली.

विनयः काय म्हणतोस ?

विलासः विजापुरेसाहेब नुसता हवा काढून घेतल्यासारखा चुरगळून गेला होता.

विजयः म्हणजे काय भानगड तरी काय आहे ?

विलासः नंतर मी -- म्हणजे वेलणकरसाहेब गेल्यानंतर -- सहज जाताजाता विजापुरेसाहेबांना विचारलं -- म्हटलं काय विशेष ? तर जरा वेळ ते विचारातच पडले. नंतर म्हणाले की त्यांच्याबद्दल हेडऑफीसला कुणीतरी निनावी तक्रारपत्र पाठवलंय. त्यात आफीसातल्या कामाचे बरेच तपशील दिलेले आहेत. नंतर ते मला म्हणाले की त्या पत्रात आपल्या स्टाफ मेंबर्सपैकीच कुणाचा तरी हात असणार. बाहेरच्या माणसाला ऑफीसातल्या इतक्या गोष्टी लिहिताच येणार नाहीत.

विजयः च्यूत्या आहे साला ! म्हणजे आपला डाऊट आहे त्याला !

विनयः भिकारचोट आहे साला ! समजा आला असला आपल्याबद्दल संशय तरी असं मोघम बोलायचं काय कारण ? तो माणूस पिनपॉईंट होऊन निश्चित कळेपर्यंत गप्प तरी बसायचं ! आता म्हणजे साले आम्ही सगळेच संशयास्पद ! आणि माझे न् त्याचे मधनं मधनं खटके उडतात म्हणजे तो मीच असणार असं तुम्हाला वाटायचं !

विलासः मग तसं म्हटलं तर विज्याला त्यानं वॉर्निंग मेमो नव्हता दिला ?

विनयः म्हणजे तू स्वतःला काय संशयातीत समजतोस काय ? तू तसा इथं आमच्या आधीपासून काम करतोयस -- इथल्या जेवढ्या बारीकसारीक गोष्टीसुध्दा तुला माहीत आहेत तेवढ्या कुणालाच माहिती नसतील. आणि विजापुरेसाहेब तुझ्याजवळ ही गोष्ट बोलला म्हणजे विश्वासानंच बोलला असं म्हणता येणार नाही. कदाचित मनातनं त्याला तुझाच डाऊट असेल.

विलासः ते जाऊ दे रे, नुसतं काय घडलं ते सांगितलं ! आपण काही असले निनावी पत्रांचे बायकी उद्योग जन्मात कधी केलेले नाहीत. मी तर याला झाट किंमत देणार नाही.

विजयः जाने दो. निश्चित कळेपर्यंत आपण हे काहीच मनावर घ्यायचं कारण नाही. आपण आपलं नॉर्मल राहायचं.

विनयः पण विनाकारणच आता आपल्या आपल्यात एक भीतीचं वातावरण तयार झालं की नाही ? लिहिणारा भडवा कोण असेल तो असेल -- आपल्या डोक्याला उगीचच ताप -- ( विठ्ठल प्यून येतो.)

विलासः या विठ्ठलराव ! ऑफीस सुरू होऊन फक्त अर्धा तास झालाय. आज लौकर आला वाटतं !

विठ्ठलः ( हसून ) हं -- काय कॉन्फिडेन्शल चाललं होतं वाटतं ? ( मस्टरवर सही करत ) या ऑफीसात च्यायला ओपन गोष्टींपेक्षा कॉन्फिडेन्शल गोष्टीच जास्त आहेत. ( पुढे येऊन विलासला ) काय खरं की नाही विलासराव ?

विलासः तसं नाही रे -- ते कालचं पत्राचं बोलले ना साहेब -- त्याबद्दल चाललं होतं.

विठ्ठलः ते मी ओळखलंच म्हणा. तसं खूप बघून बसलोय मी. हे विजापुरे साहेब. यांच्या आधी इथं व्ही.बालकृष्णन साहेब होते, त्यांच्या आधी विल्यमसाहेब होते, त्या आधी व्ही.व्ही.कुलकर्णी होते, त्या आधी समुद्र होते.

विजयः समुद्र ! समुद्र नावाचा माणूस इथे होता ? या ऑफीसात ?

विठ्ठलः होता म्हणजे काय नेमणूक झाली होती. इथं आले, रुजू झाले, एकच दिवस काम केलं -- नंतर काय इथली हवा मानवली नाही का काय कोण जाणे ! आजारीच पडले. दोन महिने हॉस्पिटलात होते. नंतर परत बदली मिळवून गेले ते . म्हणजे या ऑफीसात काम असं एकच दिवस केलं त्यांनी. काम तरी कसलं -- नुसतं चार्ज घेणं चाललं होतं दिवसभर. ए.बी.समुद्र !

विजयः अच्छा ! का असे ना ! समुद्र नावाचा एक माणूस या ऑफीसात आला होता म्हणजे ! एरवी हे ऑफीस म्हणजे नुसतं विकार विलसितच आहे ! अं ! व्ही फॉर व्हिक्टरी !

विठ्ठलः आता आजपासून ते लेडी - टायपिस्ट नेमलीय ना ती रुजू होतीय कामावर. कुमारी विशाखा बेलापूरकर.

विजयः म्हणजे पुन्हा ' वि ' !

विनयः ( उभा राहून भारल्यासारखा ) बंधूंनो ! हे सगळंच गंभीर आहे ! ज्या देशात निनावी पत्रांचं प्रमाण वाढत चाललेलं आहे त्या देशात एक साधा सामान्य माणूस म्हणून जीवन कंठणं कठीण आहे ! ( सगळे पाहात राहातात.)

विलासः ( पाहात ) जा मग युगांडात ! काढ तिथं एक पोस्टाचं तिकीट स्वतःच्या चित्राचं ! आम्ही ते इथं जपून

ठेवू ।

विजयः नाही तर ॲमेझॉनच्या खोऱ्यात जाऊन राहा.

विनयः ( बसून ) नाही, जाण्याचं नाही, पण वातावरण दूषित होत चाललं आहे एवढं खरं. बरं जाता जाता कुणीतरी मला ' खोरं ' म्हणजे काय ते सांगेल काय ? विज्यानं हा शब्द वापरला असल्यानं त्यानं अर्थ सांगितला तरी चालेल.

विजयः खोरं म्हणजे आपलं -- खोरं म्हणजे -- नाही बुवा -- नीट नाही सांगता येत --

विनयः दुसऱ्या कुणी अर्थ सांगावा.

विलासः नाही माहिती बुवा.

विनयः विठ्ठलराव ?

विठ्ठलः आता तुम्ही इतके शिकले सवरलेले. मी काय सांगायचं ?

विजयः पण ॲमॅझॉनचं खोरं आहे एवढं नक्की.

विलासः जनरल नॉलेज पाहिजे सालं थोडं थोडं -- पंचाईत होते नाहीतर --

विनयः ( पुन्हा उभा राहून ) बंधूंनो ! हे सगळंच गंभीर आहे ! ज्या देशांत निनावी पत्रांचं प्रमाण वाढत चाललेलं आहे त्या देशात एक साधा सामान्य माणूस म्हणून जीवन कंठणं कठीण आहे ! ( -- हे संपायच्या आधीच विजापुरेसाहेब आणि कु.विशाखा बेलापूरकर प्रवेश करून उभे.)

विलासः जा मग युगांडात ! --

विजयः नाहीतर ॲमेझॉनच्या खोऱ्यात ! खोरं म्हणजे काय ते न विचारता !

विजापुरेः तर विशाखाबाई, हे तुमचं टेबल. ( इथे सगळ्यांचे लक्ष जाते.) आतापर्यंत टायपिंगची कामं हे विलासरावच करायचे. पण आता कामं वाढत चालल्यानं टायपिस्टची नवीन पोस्टच क्रीएट झालीय इथं. तुम्हाला हे मार्गदर्शन करतील.( विलासकडे निर्देश.)

विशाखाः ठीक आहे. मी सुरुवात करते कामाला. पण आज पहिल्याच दिवशी मला यायला जरा उशीर झाला त्याबद्दल माफ करा हं साहेब ! म्हणजे खरंच हे ऑफीस सापडायला वेळ लागला.

विजापुरेः असू दे, असू दे ! मी तसं कुणाला काही बोलत नसतो. कधीही येतात जातात -- चालतंय. कामं होतायत की नाही एवढं मी पाहतो. निदान महत्त्वाची तरी. आता हे लोक या देशात असं आहे, त्या देशात तसं आहे वगैरे भाषणंसुध्दा करतात ऑफीसात ! बघितलंच तुम्ही ! असो. सुरू करा. ( जातात. विजापुरेसाहेब गेल्यावरही कुणी काही बोलत नाही. सगळे आपापल्या कामात. विशाखा आपल्या खुर्चीवर जाऊन बसते. विठ्ठल झाडू घेऊन येतो आणि झाडलोट सुरू करतो.)

विजयः ( उठत ) च्यायला झाली सुरुवात ! हा विठ्ठल म्हणजे लोकांना घुसमटायची सवय व्हावी आणि नंतर मग ऑफीसात घुसमटल्यासारखं वाटू नये याची काळजी घ्यायसाठीच नेमलेला आहे.

विनयः ( खिशात हात घालून, इकडं तिकडं पाहून ) च्यायला आज मी रुमाल आणायला विसरलो वाटतं !
( शिंकतो. )

विलासः ( न उठता ) विठ्ठलराव आज आपल्या इथला कचरा नाही काढला तरी चालेल -- आज आपण अंघोळ पण केलेली नाही.( विठ्ठल कुणाचं काही न ऐकता दनादन झाडू मारत जातो --) ऐकायचा नाही साला !

विशाखाः ईऽऽकाय हे ! ऑफिसात लोक कामाला लागल्यानंतर झाडलोट चालते ! ( उठते.)

विजयः ऑफिसात लोक कामाला लागल्यानंतरच कामाव्यतिरिक्तच्या बऱ्याच गोष्टी सुरू करायच्या असतात. आता काय काय करायचं हा ज्याचा त्याचा चॉईस असतो.( विठ्ठलचे ऑफीस झाडून होईपर्यंत पळापळ चालते. मग विठ्ठल झाडू ठेवून येतो. ऑफिसात इकडे तिकडे समाधानाने पाहतो.) काय विठ्ठलराव आटोपलं ना ?
( सगळे आपापल्या जागी जातात.)

विठ्ठलः बघा की ! स्वच्छ नुसतं ! आपल्याला ऑफिसात घाण नाही आवडत ! ( स्टुलावर बसतो. तंबाखू काढतो.)

विशाखाः मी आले खरी आजपासून. पण टायपिंगचं काम नाही वाटतं आज काही ?

विलासः ( आपल्या टेबलावरची कागदांची एक मोठी चवड घेऊन येत -- ) नाही कसं ! हे घ्या ! किती कॉपीज काढायच्या वगैरे सगळं बघून तसं तसं करत चला.

विशाखाः अय्या ! म्हणजे एखादं माणूस कामाला येण्यापूर्वीच त्याच्या नावचं काम तयारच असतं म्हणजे !

विजयः नाही. तसं नाही. काम आधीच तयार असतं आणि नवं माणूस आलं की ते त्याच्या नावचं होतं -- असं । ( तो फारसं वेगळं काय बोलला हे न कळून बाकीचे बुचकळ्यात पडून मग हसून सोडून देतात. आता मात्र सगळे जरा कामाला लागतात. विशाखाही टायपिंग सुरू करते. विठ्ठल तंबाखूची गोळी लावून बसलेला. नंतर साहेबांच्या केबिनमध्ये बेल वाजते म्हणून विठ्ठल जातो. जरा वेळानं कागदांची एक प्रचंड चवड घेऊन येतो आणि ती विनयच्या टेबलावर ठेवतो. विनय नुसतं एकदा पाहतो. पुन्हा कामात.)

विठ्ठलः ( बाहेर जाऊन थुंकून येऊन --) ते एक तासाभरात पूर्ण करून द्यायला सांगितलंय.

विनयः ( शांतपणे ) होत नाही म्हणून सांग जा.( विठ्ठल जातो. थोड्या वेळानं विजापुरेसाहेब स्वतः येतात. मागोमाग विठ्ठल येऊन स्टुलावर बसतो.)

विजापुरेः ( विनयला ) तुम्ही होत नाही म्हणून सांगितलंत ?

विनयः तासाभरात होत नाही.

विजापुरेः का ?

विनयः साहेब, हे कागद असेच ठेवून याला काडी लावली नं तर सगळे कागद जळायला नुसते तीन तास लागतील !

विजापुरेः बरं बरं, मला वाद नकोय -- किती वेळात पूर्ण करता तेवढं सांगा.

विनयः तीन महिने लागतील !

विजापुरेः तीन महिने ? ? ?

विनयः कमीत कमी.

विजापुरेः ठीक ठीक -- पण तीन महिन्यांनंतर एक दिवस जास्तीचा मिळणार नाही हे लक्षात ठेवा.

विनयः यस सर ! ( विजापुरे जातात. ते गेल्यावर ) विठ्ठलराव, हा ढीग उचलून त्या पलिकडच्या कोपऱ्यात ठेवून द्या. ( विठ्ठल तसे करतो. विजय आणि विलास हे सर्व नेहमीचंच असल्यासारखं लक्ष न देता आपापल्या कामात. विशाखा टायपिंग थांबवून पाहात बसलेली.)

विशाखाः म्हणजे इतक्या सगळ्या लोकांची कामं आता तीन महिने इथं अडकून राहणार ?

विनयः ( जरा वेळ नुसताच पाहातो. मग --) तीन महिने ही पहिली मुदत आहे. जग खूप मोठं असतं. तुम्हाला खूप कळायचंय अजून. (विशाखा कामाला लागते. )

विजयः ( हलक्या आवाजात ) विन्या, लेका साहेबाच्या वशिल्याची आहे ती. जरा जपून बोल.

विनयः मलाही माहिती आहे. म्हणूनच असं बोलायचं.

विलासः अशा वागण्यानं ते निनावी पत्र विन्याचंच असेल असा ग्रह पक्का होत जाईल झालं !

विनयः ( मोठ्यांदा ) अरे उघडपणे बोलू दे भडव्याला माझ्याबद्दल ! नाही पायातला जोडा काढला तर एका बापाचा मुलगा नाही म्हणवणार स्वतःला !

विलासः आयला, पण आमच्यावर कशाला चिडतोस ? ( विशाखा दचकलेली. पुन्हा कामाला लागते.)

विजयः ( जरा वेळानं ) मला वाटतं, जो कुणी असेल ते पत्र पाठवणारा त्यानं निदान आपल्याआपल्यात तरी कबूल करून टाकावं, उगीच नसता ताप नको डोक्याला.

विनयः म्हणजे तू नव्हेस तो -- अं ? म्हणजे आमचा दोघांचा डाऊट घेतोस होय रे -- एऽऽबोल की रे बाळा --

विजयः नाही तसं नव्हे --

विनयः मग कसं रे ? तूच असशील-- भित्रा साला -- आणि तो भडवा माझा संशय घेणार आणि त्रास देणार मलाच -- म्हणे तासाभरात करा ! -- भडव्याच्या दहा पिढ्या उतरून ॲट अ टाईम कामाला बसल्या तरी होणार नाही ते तासाभरात !

विलासः मी म्हणतो भांडायचं कशाला आपण ? आपल्याआपल्यातच ? काय असेल ते होईलच उघड, नाहीतर न होईल !

विशाखाः कसला एवढा वाद चाललाय ? म्हणजे मी विचारू नये पण कामातलं काही आहे का ? मी मदत करीन. ( तिघेही गप्प. आपापल्या कामात.)

विजयः ( जरा वेळानं हलक्या आवाजात ) म्हणजे विन्या, हिच्या सी.आय.डी. गिरीचा नवीन ताप सुरू होणार असं मला वाटतंय.

विनयः ते मला एका दृष्टीनं बरं आहे. कारण तो भडवा माझ्यावर जास्त लक्ष ठेवायला सांगणार. म्हणजे आपोआपच ती जास्त माझ्याजवळ येत राहील. बरी आहे तशी.

विलासः चुकलास. सी.आय.डी.गिरी करायला अगदी जवळ यायला लागतं असं काही नाही आणि किती जवळ यायचं हे तिच्या इच्छेवर राहणार. उलट कामातलं मार्गदर्शन तिला मी करायचं आहे. म्हणजे मी स्वतःहून पाहिजे तेव्हा जाऊ शकतो -- मार्गदर्शन करायला !

विजयः नुसतं बोलणं वेगळं आणि प्रत्यक्ष काही करणं वेगळं. बाईला हात लावायला धैर्य लागतं तेवढं अंगात.

विलासः आहे, तुझे विचार चांगले आहेत. पण जरा वेळकाळ बघून धैर्य दाखव, नाहीतर जोडा बसायचा.

विनयः आणि वर नोकरीही जायची ! ऑफिसात कुठल्याही मानवी गोष्टी झाल्या तर ऑफिसच्या शिस्तीचा भंग ठरतो महाराजा !

विजयः अरे नोकरीबिकरी गेली खड्डयात ! हमाली करायची ताकद आहे आपल्यात !

विलासः हे पण बोलणं वेगळं आणि प्रत्यक्ष करणं वेगळं ! मी निघालो बघ -- प्रत्यक्ष मार्गदर्शन करायला.( उठतो. विशाखाकडे जातो. ती टाईपिंग करीत असते तिथे जाऊन उभा राहतो. मग --) काही अडचण नाही ना -- कामात ?

विशाखाः नाही, काय आहे, हे हस्ताक्षर जरा नीट लागत नाहीय.

विलासः बरोबर आहे. हे साहेबांचं हस्ताक्षर आहे. नाहीतरी सारखं हातानं लिहून लिहून त्यांचा हात खराबच झालेला आहे.

विशाखाः म्हणजे ?

विलासः नाही म्हणजे इतर कामामुळं मला टाईपिंगला फारसा वेळ मिळायचाच नाही. मग मी बरंच काम परत पाठवायचो. मग ते हातानं लिहायचे. म्हणून तर त्यांनी तुम्हाला आणलं.

विशाखाः मला कुणी आणलं--बिणलेलं नाही. रीतसर परीक्षा, इंटरव्ह्यू घून आलीय मी.

विलासः नाही, तसं नव्हतं म्हणायचं मला. म्हणजे माणूस बघूनच कळत की ते. तुम्ही काही तशा दिसत नाहीच नाही तरी.

विशाखाः मग कशी दिसते ?

विलासः आता कशी म्हणजे -- आता -- कारण -- म्हणजे सुंदर दिसता असं म्हटलं तर राग यायचा एखादवेळेस तुम्हाला.

विशाखाः म्हणजे तुम्ही अजून मला सुंदर म्हटलेलं नाही असं मी समजते.

विलासः नाही, म्हणजे अगदी तसंच काही समजू नका तुम्ही -- पण काही अडलंबिडलं तर नुसती आठवण केलीत तरी आहेच मी जवळ.

विशाखाः ( हसून ) अय्या ! म्हणजे परमेश्वरच तुम्ही !

विलासः नाही, अजून परमेश्वर नाही, पण परमेश्वर व्हायची इच्छा आहे ! ( बेल वाजते. म्हणून विठ्ठल आत जातो. लगेच परत येतो.)

विशाखाः मजाच दिसतीय एकूण इथं !

विलासः मजेत वाढ व्हायलाही खूप वाव आहे.

विठ्ठलः ( विशाखाला ) तुम्हाला साहेबांनी बोलावलंय. ( विशाखा उठते आणि जाते. विलास परत येऊन आपल्या जागेवर बसतो.)

विजयः खरा परमेश्वर तो -- तो आतला लेका ! तू नुसता देव्हाऱ्यातला परमेश्वर !

विनयः स्वतःच उदबत्ती लावायची आणि पडणारी राख बघत बसायचं !

विलासः जळू नका मित्रांनो, मी फक्त माझी ऑफीशियल ड्यूटी करत होतो

विजयः ऑफिशियल ड्यूटीला मर्यादा ठेवा म्हणजे झालं, नाहीतर नोकरी घालवून बसाल.

विलासः अरे नोकरी गेली खड्डयात ! च्यायला भीक मागू ! आहे काय त्यात !

विजयः म्हणजे नोकरीची तशी आपल्याला कुणालाच पर्वा नाहीय म्हणा की !

विलासः पर्वा आहे -- पण याचा अर्थ नोकरी जायची प्रचंड भीती आहे असा नाही -- एवढंच !

विनयः बरं चला, या बोलीवर जरा चहाला जाऊ !

विजयः वाह ! आज विन्यानं स्वतःहून चहाचा विषय काढला ! चला ऽऽ, शुभस्य शीघ्रम ! ( तिघेही उठून जातात. जरा वेळाने विशाखा येऊन आपल्या जागेवर बसते. विठ्ठल स्टुलावर. )

विशाखाः गेले कुठं सगळे ?

विठ्ठलः चहाला !

विशाखाः म्हणजे आता ही टी -- टाईम ?

विठ्ठलः आता चहाला गेलेत म्हणजे टी - टाईमच की !

विशाखाः साहेब काही बघत नाहीत वाटतं ?

विठ्ठलः ( जवळ येऊन ) अहो सायबानंच इतके घोळ केलेत आणि इतके फायदे घेतलेत की तो काय बघणार ! त्यातल्या त्यात कामं होतात की नाही एवढं बघतो ! आता ती निनावी पत्राची एक भानगड चालू झालेली आहेच -- कळेलच म्हणा तुम्हाला हळूहळू...( पुन्हा जाऊन स्टुलावर बसतो. विशाखा टायपिंग सुरू करते.)...पंढरीनाथा ऽऽ तूच एक खरा बाबा ! ( उठतो आणि जातो. जरा वेळाने साहेबाची बेल वाजते. पण विठ्ठल नाही. पुन्हा वाजते. मग जरा वेळाने साहेब स्वतः एक कागद घेऊन येतात.)

विजापुरेः कुठं गेले हे सगळे ? आणि विठ्ठलही गेला वाटतं ?

विशाखाः आत्ता होता की इथंच --

विजापुरेः बरं, हे लेटर जरा अर्जंट आहे हं. एवढं हातातलं संपलं की हे करून टाका. आज जायला पाहिजे हे.

विशाखाः ( घेऊन ) हं.

विजापुरेः काय असतं, या लोकांची युनियनबिनियन असते. त्यामुळं जरा जपूनच राहावं लागतं. शिस्तीकडंही फार बघून चालत नाही. आता तुलाही ते युनियनच्या मेंबरशिपबद्दल विचारतील. होय म्हणायचं आणि मेंबर व्हायचं. म्हणजे मॅनेजमेंटकडून किंवा युनियनकडून दोन्ही बाजूंनी अन्याय होण्याची शक्यता कमी असते. आता पहिल्याच दिवशी मी इतकं बोलू नये. तसं घाबरून जायचं काही कारण नाही. पण प्रत्येकाची काळजी घ्यायची आणि शक्यतो कुणाचं नुकसान होऊ द्यायचं नाही हा माझा स्वभावच आहे. ( विशाखा सगळं नुसती ऐकते. ) बरं मग हे एवढं करून पाठवून दे नंतर माझ्याकडं. तशी तू मला मुलीसारखीच माझ्या. अं ?

विशाखाः हो -- पाठवते.( विजापुरे जातात. ते जात असतानाच तिन्ही कारकून येतात. साहेब दखल न घेता जातात. तिघेही आपापल्या जागांवर बसतात.)

विजयः विठ्ठऽऽल...च्यायला गेला कुठं हा ?

विशाखाः चहा प्यायला गेला असेल.

विजयः अरे चहा प्यायला म्हणजे काय भलत्या सलत्या वेळी ? येतो मुळात उशिरा. आता मला एक फाईल हवी आहे ती काय मी शोधून आणायची ?

विलासः अरे बाबा ओरडू नकोस उगीच. हे काय आजचंच आहे का ? हे आफीस च्यायला असंच राह्यचं --मरतमढ्यासारखं.

विनयः त्यातल्या त्यात कामं होतात की नाही एवढं बघायचं. ( तिघेही हसतात आणि कामाला लागतात.)

विठ्ठलः ( येऊन बसत -- तंबाखू चोळत ) पंढरीराया ऽऽ...

विजयः ( त्याच्याकडे पाहून ) हं -- पंढरीरायाऽऽ -- या ! इकडं या । ( विठ्ठल येतो. ) असं करा, जरा एबीसी फाईल आणा.

विठ्ठलः जी । ( तंबाखूची गोळी लावतो आणि मग जातो. जरा वेळाने परत येतो. ) सापडत नाही साहेब --

विजयः सापडत नाही ? बघितलंस तरी का नीट ?

विठ्ठलः सगळ्या फाईली धुंडाळल्या. बाकी सगळ्या फाईली आहेत. फक्त ए बी सी तेवढीच नाही.

विजयः बाकी सगळ्या आहेत ही आनंदाची बातमी आहे -- आता असं करा -- थांबा -- ( एका चिटोऱ्यावर काही लिहितो. ते चिटोरे विठ्ठलला देत ) -- हे द्या साहेबांना. ( विठ्ठल आज्ञाधारकपणे जातो. ) विल्या, आता मजा बघ. आत चिठ्ठी पाठवलीय -- एबीसी फाईल मिळत नाही . कृपया सूचना द्यावी -- म्हणजे प्लीज इन्स्ट्रक्ट -- ते उठून आता स्वतःच घेऊन येतंय बघ फाईल -- ( आतून वि. साहेबांचा मोठा आवाज -- 'अरे फाईल मिळत नाही म्हणजे काय ? शोधलीस का नीट सगळीकडं? बघा की जरा. मी कुठंकुठं बघू ?' विठ्ठल 'शोधली' म्हणतो. 'काय शोधली ऽऽ ?' ताड ताड पायांचा आवाज. मग एक मिनिटाने साहेब स्वतः ती फाईल घेऊन येतात.)

विजापुरेः हं -- घ्या ! ( ताडताड निघून जातात. सगळ्यांच्या चेहऱ्यांवर स्मित. विजय फाईल उघडून पाहतो.)

विजयः आता यात ऑक्टोबरचं स्टेटमेंट लावलेलं दिसत नाही. अहो, विठ्ठलराव -- ( विठ्ठल उठून येतो. ) अहो यात ऑक्टोबरचं स्टेटमेंट नाही लावलं ?

विठ्ठलः असेल की.

विजयः अहो, असेल की काय ! नाहीय म्हणतोय ना मी !

विठ्ठलः बघतो. एखाद वेळेस चुकून एक्सवायझेडला गेलं असेल.(जातो. )

विनयः नुसतं विज्या तू पिळत बस बघ दिवसभर !

विठ्ठलः ( जरा वेळानं येऊन एक कागद देत ) हं हे घ्या ! एक्सवायझेडलाच होतं.

विजयः आनंद आहे. द्या ! ( घेतो. फाईलीत लावतो.विठ्ठल जाऊन स्टुलावर बसतो.)

विलासः ( विजयला ) आता मिळालं ना सगळं ? काम करा आता.

विजयः अरे कामाचं काय -- त्याला किती वेळ लागतोय ! ( सगळे आपापल्या कामात मग्न. )

विनयः हा विल्या साला नुसतं ऐकून घेतो सगळं -- भडवा तो निनावी पत्राचा विषय माझ्या पुढं काढू दे !

विलासः शूऽऽऽक् ! ( पुन्हा सगळे कामात. )

विजयः ( जरा वेळानं ) स्त्री -- कर्मचारी पाहिजेच खरं म्हणजे एक तरी ऑफिसात -- वातावरणात जरा तरी म्हणजे जिवंतपणा वाटतो.

विलासः शूऽऽऽक् !

विजयः च्यायला, कामाचा बराच हुरूप आलेला दिसतोय तुला -- सारखं शूऽऽक् शूऽऽक् करतोयस ते !

विलासः शूऽऽक् !

विजयः मेंबरशिप फॉर्म भरून घे तिचा युनियनचा.

विलासः सगळं तयार आहे. फक्त सही घ्यायचीय.

विनयः ते त्याला सांगायला नको.

विलासः चेष्टा करताय होय रे ? युनियन आहे म्हणून तुम्ही आहात साल्यो !

विनयः आयला, चेष्टा कसली ? उलट मी ग्लोरिफाय करत होतो तुला ! पुढारी तू आमचा !

विलासः ठीकाय, ठीकाय ! ( पुन्हा सगळे कामात -- विठ्ठल उठून उगीच आपलं येतो आणि त्यांची कामं चाललेली बघत समोरच उभा राहतो.) अच्छा -- मी एक तुम्हाला असं विचारतो -- बघा हं -- म्हणजे असं कधी जाणवलंय का तुम्हाला -- की घरी असलं म्हणजे ऑफीस हा घरच्या प्रॉब्लेम्समधला एक प्रॉब्लेम वाटतो आणि ऑफिसात असलं की इथल्या सगळ्या प्रॉब्लेम्समधला घर हा एक प्रॉब्लेम वाटतो. अं ? असं वाटतं की नाही ?

विठ्ठलः प्रॉब्लेम म्हणजे काय हो साहेब ?

विजयः प्रॉब्लेम म्हणजे प्रश्न -- पण तू कशाला ऐकत उभा राहतोस सगळं ?

विठ्ठलः नाही मग मला पण तसं वाटतं कधीकधी म्हणून विचारलं. आता खूप वर्षं गेली म्हणा अशीच --

विजयः आपण असली भंकस जास्त लावत नाही डोक्यात. जसंजसं असेल तसंतसं करत जायचं आणि उरलेल्या वेळात दुसरं काहीतरी करायचं.

विनयः दुसरं काहीतरी म्हणजे काय ? सांग की स्पष्ट -- निनावी पत्रबित्र टाकायचं म्हणून !

विजयः थोबाड फोडीन साल्या ! समजतोस काय !

विलासः अरे हो, हो -- आपलं ठरलं ना तो विषय बंद म्हणून ? कुणालाच काही माहीत नाही, त्याच्यावर कशाला आपण डोकेफोड करायची ? च्यायला हे इतकं सगळं भयानक चोथट असून आपण सगळे यात इतका प्राणपणानं रस घेतो याचंच आश्चर्य वाटतं मला कधीकधी.

विनयः झक मारत घ्यावाच लागतो रस ! न घ्यून काय करताय !

विठ्ठलः ( परत जाऊन स्टुलावर बसत ) आम्ही शिकलो असतो तर आम्ही पण झालो असतो क्लार्क ! म्हणे तू का उभा राह्यलास ! मी काय माणूस नाही ?

विजयः अहो विठ्ठलराव, तसं नाही हो --

विठ्ठलः काय तसं नाही ! चालू द्या तुमचं -- तुम्ही मोठे ! तुम्ही शहाणे ! तुम्ही शिकलेले !

विजयः अहो तसं काही नाही -- या, राहा की इथं उभे -- आमचं काय जातंय त्यात --

विठ्ठलः कशाला ते ? नुसतं प्रॉब्लेम म्हणजे काय इतकं म्हटलं तर इतकं ! तुम्ही नाही जात सायबाकडं सत्रा गोष्टी विचारायला !

विलासः विठ्ठलराव, बास झालं, उगाच काय च्यायला वाद घालताय --

विठ्ठलः बास झालं तर बास झालं --

विशाखाः विठ्ठलराव -- हे जरा साहेबांना नेऊन द्या. अर्जंट आहे म्हणाले होते.( विठ्ठल येऊन घेऊन जातो.)

विजयः ( विशाखाकडे दयाळूपणे पाहात विलासला ) सुरुवाती सुरुवातीला किती सिन्सिअरली काम करावं लागतं नाही विल्या !

विनयः कायमच सिन्सिअरली कामं केलीत तरी काही मरणार नाही तुम्ही !

विजयः गप्प बसा ! माहितीय तुमची सिन्सिरिटी ! सत्रांदा आजारी पडतंय सालं !

विनयः लहानपणी नवरा मेलेल्या सत्तर वर्षाच्या म्हातारीसारखं कुत्सित बोलण्याशिवाय येतंय काय तुला ?

विजयः होय की । तुझ्या बापाचं आणि तुझ्या आईचं पटलं नाही हा आमच्याच कुत्सितपणाचा दोष की ! म्हणून तू आमच्यावर चिडचिडत राहणार.

विलासः विनय, थांब -- स्टॉप इट ! कशाला च्यायला एकमेकांच्या खाजगी गोष्टी काढताय ऑफिसात ?

विनयः मी काय बोललो होतो का खाजगी ? हा ज्याचं नाव बाप म्हणून लावतो त्याचाच हा मुलगा आहे की काय याची चर्चा ऐकतो आम्ही, पण काढतो आम्ही कधी हे विषय ?

विजयः तुझ्यायला !( मारायला उठतो. विलास त्याला ' अरे अरे ! -- ' म्हणून धरतो आणि बाहेर घेऊन जातो. विठ्ठल उठून जवळ आलेला. पाहात राहतो. विशाखा घाबरून उठलेली . पुन्हा बसते.)

विठ्ठलः ( विनयची सहानुभूती मिळवण्यासाठी ) हे म्हणे शिकलेले ! वा ! ( विनय निमूटपणे कामात -- विजापुरेसाहेब येतात.)

विजापुरेः अरे काय बाबांनो, काय चाललंय ! मला तिथंपर्यंत आवाज ऐकायला आले !अं !( विनय निमूट कामात. ) मी म्हणतो इथल्याइथं मिटावं -- अं -- आपल्या आतल्या गोष्टी वरपर्यंत जाऊ नयेत -- पण तुमचं काही सहकार्य हवं की नको ? ...काय रे विठ्ठल ?

विठ्ठलः होय साहेब.

विजापुरेः आता ही मुलगी आजपासूनच कामाला आलीय ! काय हा तमाशा ! छे !( जातात.)

विशाखाः ( विठ्ठलला ) हे असं नेहमी चालतं ?

विठ्ठलः हां तसं चालतं नेहमीच पण रोजच्या संबंधात -- कामात वगैरे फरक पडत नाही. परत दिलजमाई होते. पण आज खाजगी गोष्टी निघालेल्या दिसतात. माझा अनुभव असा आहे की खाजगी गोष्टी ऑफिसातल्या भांडणात आल्या की परत संबंध सुधारत नाहीत.

विनयः बरं विठ्ठलराव, तुम्ही तुमचं काम बघा --

विठ्ठलः राह्यलं -- ( जाऊन स्टुलावर बसतो. जरा वेळानं विलास आणि विजय येतात. आपापल्या जागांवर बसतात. सगळे गप्प. काम चालू.)

विठ्ठलः झालं -- आता लंच टाईम होत आलंच. ( बाकीचे सगळे गप्प. काम चालू. )

विशाखाः विठ्ठलराव -- ( विठ्ठल उठून येतो.) काही नाही -- बसा बसा. मी इतकंच म्हणणार होते की फार सीरियस वातावरण वाटतं इथं ऑफिसात --

विठ्ठलः ( बसत ) हां हां -- ( पुन्हा शांतता. काम चालू. जरा वेळाने विजापुरेसाहेब येतात. कुणी लक्ष देत नाही. शांतता आणि काम चालू. )

विजापुरेः हे बघा -- बरं का --ऐका जरा सगळ्यांनी-- ( सगळे लक्ष देतात. विठ्ठल उठून येऊन उभा राहतो. विशाखा उभी राहते.) विशाखा, तुला घाबरायचं काही कारण नाही, पण मी काय सांगतोय ते सगळेजण ऐका -- आत्ताच एका ठिकाणी टेलिफोन कॉल झाला माझा. कॉल दुसऱ्या काही कारणासाठी होता. पण म्हणजे गोष्ट जरा कठीणच होणार आहे अशी मला कुणकुण लागलीय. ते निनावी पत्र कुणी लिहिलं असेल ते असो. तो आता म्हणजे चर्चेचा भाग होऊ शकत नाही. पण त्या निमित्तानं एकूणच परिणाम वाईट होणार असं दिसतंय. मला असं कळलंय की, संपूर्ण ऑफिसचीच तपासणी करायचा हेड आफिसचा विचार आहे-- तर आपल्याला जरा तयारीत राह्यला पाहिजे. एक आठपंधरा दिवसांत कामं बरीचशी पूर्ण करून नीटनीटकी ठेवायला पाहिजेत. जरा ताण जास्त पडणार आहे आपल्या सगळ्यांच्यावरच पण पुढचा त्रास जर कमीत कमी करायचा असेल तर म्हणजे हे अत्यावश्यक आहे. बघा, विचार करा आणि तुमच्या काही सूचना असल्या तर सांगा.

विलासः नाही, कामं करू आम्ही -- त्याचा प्रश्न नाही -- पण तपासणी वगैरे झाली तर त्यात सगळेजण गोवले जाण्याचं काही कारण दिसत नाही.

विजापुरेः तसंच होईल असं नव्हे. इतर काही गोष्टींचे दोष -- आरोप कुणावर काय येतील ते येतील -- पण आपण कामं तरी जरा व्यवस्थित ठेवावी एवढंच माझं सांगणं आहे. तुम्ही विचार करा यावर -- उद्या

आपण लाईन ऑफ ॲक्शन ठरवून टाकू. बरंय. मी जरा एक दोन तास बाहेर जाऊन येतोय.

विलासः ठीक आहे. ( वि.साहेब जातात. काही क्षण शांतता. )

विजयः मला वाटतं विल्या, ही सगळी नुसती एक चाल आहे. भीतीच्या दडपणाखाली आपण जीव तोडून भराभर कामं करावी म्हणून. ताबडतोब जरनल सेक्रेटरीला कन्सल्ट कर.

विनयः आणि कुणी सांगावं ते निनावी पत्र यानं स्वतःसुध्दा पाठवलं असेल.म्हणजे विजापुरेनं स्वतः म्हणतोय मी !

विलासः त्याचा काय फायदा त्यात ?

विनयः आता हे बघ. सगळ्या गोष्टी काही आपल्याला माहीत आहेत का ? असं करणं हा त्याला कमीतकमी नुकसानीचा मार्ग वाटला असला तर ? किंवा आपल्यात फूट पाडण्यासाठीही असेल ! किंवा नुसतीच जरा टेन्शन्स वाढवून आता तो आपल्या सगळ्यांचा हितकर्ता आहे असं दाखवून त्याचा होल्ड वाढवायचा असेल त्याला ! आणि वरचे लोक सहकार्य देतात असल्या डावपेचांना ! त्यांना काय कामं होण्याशी मतलब !

विजयः मग मी काय म्हटलं ? जरा थोडक्यात म्हटलं एवढंच ! आणि असं असल्यावर ते निनावी पत्र खरोखरच जायची तरी काय गरज आहे ?। नुसतंच उठवायचं गेलंय म्हणून !

विलासः आपलं तर काही डोकं चालत नाही. आपले अंदाज चुकीचे पण असू शकतील.

विजयः जाऊं दे, च्यायला द्या सोडून ! फुकट नसती टेन्शन्स आहेत झालं ! सगळंच विसरूया.च्यायला, रिलॅक्स ! घरही विसरा आणि ऑफिसही विसरा ! जरा मोकळं झाल्याशिवाय काही खरं नाही. काय विन्या ? ( विनय बोलत नाही. ) अजून च्यायला रागात ? विसर की बेटच्या सगळं -- निदान थोडा वेळ...

विठ्ठलः विसरायचं म्हणजे काय करायचं काय ?

विजयः विठ्ठलराव, करेक्ट ! प्रश्न अगदी बरोबर आहे तुमचा. आपण गाणं म्हणूया. आणि सिनेमातलं वगैरे नको.

विठ्ठल : मग दुसरं कुठलं हो गाणं ?

विजयः हं म्हणा --

आले आजोबा ओटीत...

काठी टेकित टेकीत...( या ओळींची आवर्तनं सुरू होतात -- हळू हळू सगळे सामील होतात. विजय थोडाफार नाचतो सुध्दा -- बाकीचे टाळ्या वाजवतात. विशाखाही हळूहळू सामील होते... जरा वेळ हे चालते.)

विशाखाः हं आता हे --

दादा गेलेत माझे पंढरीला

किल्ल्या राहिल्यात माझ्या कंबरीला...

( सगळे खूष -- आता या ओळींची आवर्तनं आणि विजयचा नाच चालू राहतो. रंगात येत जातो...)

...पडदा पडत जातो...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,

३, स्नेहदीप अपा.

चिंतामणीनगर,

सहकारनगर नं.२, पर्वती,

पुणे - ४११ ००९.

**दूरध्वनी - ४२२ ७८४७.**